# विल्यम टेल

**लेखक: लिओनार्ड फिशर**

**मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक**



अशी आख्यायिका आहे कि चौदाव्या शतकात स्विसच्या जनतेवर ऑस्ट्रियाच्या हॅप्सबर्ग राजघराण्याची जुलमी राजवट होती. त्यांच्या जुलमी अत्त्याचाराविरुद्ध एक माणूस पेटून उठला. त्याचे नाव विल्यम टेल.

आपल्या लोकांना गव्हर्नरच्या टोपीपुढे गुडघे टेकावे लागत ह्याने विल्यम टेल अस्वस्थ होता. त्याने स्वत: तसे करायला ठाम विरोध केला. त्याबद्दल त्याला भयंकर शिक्षा देण्यात आली. त्याच्या मुलांच्या डोक्यावर सफरचंद ठेवण्यात आले. टेलने नेम धरून त्याचे बरोबर दोन तुकडे करायचे. तसे जर त्याला करता आले तर शहराच्या प्रमुख चौकात ठेवलेली टोपी काढून टाकण्यात येईल. आणि जर त्यात तो अपयशी झाला तर त्याचा मुलाला, जिमीला ठार मारण्यात येईल.

अतिशय आकर्षक भाषा आणि सुंदर चित्रांनी लिओनार्ड एवरेट फिशरनी मुक्तीचे रूपक-विल्यम टेलची कहाणी सांगितली आहे.



# विल्यम टेल

लेखक आणि चित्रे: लिओनार्ड फिशर

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

गॅस्सलर चौकात उंच टांगलेल्या विशाल घंटेचा आवाज दुमदुमला. आजूबाजूच्या डोंगरामध्ये जणू काही डझनभर घंटा वाजवतंय असा प्रतिध्वनी घुमला. सगळे लोक लगबगीने चौकात जमले.

"फर्मान!", दूत खलिता उघडत ओरडून म्हणाला.

"ऐका हो ऐका! उपस्थित असलेल्या सर्वांनी ऐका! दहा वर्षे आणि त्यावरील सर्व जनतेने आज दुपारपासून गव्हर्नरच्या म्हणजेच हर गॅस्सलरच्या टोपीपुढे गुडघे टेकून आदर व्यक्त करायचा आहे. उरी परगण्यातल्या अल्टडॉर्फ़ जिल्ह्यातील गॅस्सलर चौकात एका उंच खांबावर ही टोपी ठेवली जाईल. हा भाग हॅप्सबर्ग राजघराण्याचे राजे पहिला अल्बर्ट ह्यांच्या अधिपत्याखाली आहे. टोपीपुढे न झुकणाऱ्या व्यक्तीला ताबडतोब कठोर शिक्षा केली येईल.

राजवर्ष १३०७, जुलै महिनाचा पहिला दिवस सही आणि शिक्क्यासह."



“”हर गॅस्सलर खूप दुष्ट आहे,” विल्यम रागारागाने आपल्या मुलाला, जिमीला म्हणाला, “असा अत्याचारी मी आतापर्यंत पाहिला नव्हता.”

टेल हा एक अतिशय प्रसिद्ध शिकारी आणि नेमबाज होता. तो बर्गलन जवळ राहत होता. जंगलात शिकारीसाठी जात असताना वाटेत अल्टडॉर्फ़ला जिमी आणि टेलने ही घोषणा ऐकली.

“माझ्या हातात सत्ता असती ना तर टोपी ऐवजी मी त्या हर गॅस्सलरलाच वर लटकवले असते,” एक महिला कुजबुजली.

“शुSSS,” गर्दीतल्या एकाने दटावले. “गपगुमान गुडघे टेक आणि शांत रहा.”

अल्टडॉर्फ़, बर्गलन किंवा उरीमधील इतर कुठल्याही शहरात ह्याविरुद्ध मोठ्याने बोलण्याची कुणाची हिंमत नव्हती. कारण हर गॅस्सलरचे हर सर्वत्र वावरत असत. एखादी छोटीशी चूक म्हणजे किमान दहा वर्षांचा तुरुंगवास.



मध्यप्रहराच्या थोडा वेळ आधीच हर गॅस्सलेरच्या नेतृत्वाखाली काही अधिकारी आणि सैनिकांची तुकडी अल्टडॉर्फ़च्या टाउन हॉलच्या दिशेने कूच झाली आणि संचालन करत चौकात पोचले. तिथल्या उंच स्तंभावर गॅस्सलेरची टोपी फडकावण्याचे काम करू लागले.

“मुर्खानो! सांभाळून! सांभाळून करा!,” काम हळूहळू चालू असल्याने गॅस्सलेर उसळला. “माझी टोपी जर खाली पडली तर तुमची काही खैर नाही,”



टाउन हॉलच्या घडाळ्यात बाराचे ठोके पडायची वेळ झाली कि हर गॅस्सलेर त्या खांबाच्या लगतच्या आसनावर येऊन बसे. तिथून जाणारी व्यक्ती टोपीसमोर गुडघे टेकवून निघून जाई.

“व्वा!! बहोत खूब,” तो खुश होऊन म्हणे.

लोक इकडून तिकडून जाताना चौकात गुडघे टेकवीत आणि शक्य तेवढ्या लवकर तिथून निघून जात. तिथल्या एकाही व्यक्तीची हर गॅस्सलेरच्या चेहऱ्याकडे पाहण्याची हिंमत नव्हती. त्याचा चेहरा इतका हिंस्त्र होता कि दूरवर उभे असलेले हरीण देखील त्याला घाबरून पळून जात असे.

टाउन हॉलच्या घडाळ्यात बाराचे ठोके वाजत असताना एक तरुण डुक्कराच्या मागे घाईघाईने पळत गेला. परंतु टोपीपुढे गुडघे टेकायचे तो विसरला.

“नियम तोडणाऱ्याला ताबडतोब अटक करा,” गॅस्सलर जोराने ओरडला. “त्याच्या डुक्करालाही पकडा.”

शिपायांनी त्याला चहूकडून घेरलं. डुक्कराला ताब्यात घेतलं आणि त्या तरुणाला साखळदंडांनी बांधलं. एक संधी देण्यासाठी तो तरुण गयावया करू लागला. “अशक्य!” हर गॅस्सलर त्याच्यावर खेकसला.





तो तरुण गयावया करत असतानाच एक मुलगा तिथून पळत गेला. त्याची मोठी बहिणही त्याच्या मागे पळत होती.

“आताच्या आता घरी चल,” बहिण त्याला ओरडली.

“मुळीच नाही,” मुलगा म्हणाला. आणि ते दोघे हर गॅस्सलरच्या समोरून वाऱ्याच्या वेगाने चौकातून पसार झाले. टोपीपुढे गुडघ्यात वाकायचं ते दोघेही विसरून गेले.

“दोघांना कैद करा,” हर गॅस्सलरने आज्ञा दिली.

बहिण-भाऊ साखळदंडाने कैद झाले आणि त्यांना ओढून नेण्यात आलं.

दिवसभरात जे कुणी पुरुष, स्त्रिया  आणि दहा वर्षांवरील मुले गॅस्सलर चौकातून जात, ते सर्व जण हर गॅस्सलरच्या टोपीपुढे वाकत. कधीकधी तर ते दिवसातून तीन-चार किंवा त्यापेक्षाही अधिक वेळा वाकत.

“हा निव्वळ मूर्खपणा आहे,” विल्यम टेल  चौकाजवळ येत असताना जिमीला म्हणाला. ते दोघे जंगलातून आपल्या घरी परतत होते.

“हर गॅस्सलर भले उरीचा गव्हर्नर असेल, पण म्हणून आपण काही त्याचे गुलाम किंवा नोकर नाही आहोत. मी त्याच्यापुढे किंवा त्याच्या टोपीपुढे मुळीच वाकणार नाही.”

विल्यम टेल आणि जिमी त्या स्तंभासमोरून सावकाश चालत पुढे गेले. गॅस्सलर अजूनही खुर्चीवरच बसलेला होता. जो कुणी त्याच्यापुढे किंवा त्याच्या टोपीपुढे गुडघे टेकवत नव्हता त्यांना धमकावत होता. “विल्यम टेल, जिमी टेल, तुम्ही दोघे,” तो जोरात ओरडला. “माझ्या टोपीपुढे न वाकता पुढे जाण्याची तुमची हिंमत तरी कशी झाली? तुम्हाला नियम माहित आहे न. चला, मुकाट गुडघे टेकून वाका.”

“गुडघे टेका..काय म्हणालास. मी म्हणतो, अजिबात नाही. तुझ्यासारख्या दुष्टाच्या टोपीपुढे मी किंवा माझा मुलगा कदापि वाकणार नाही.”



हर गॅस्सलर रागाने थरथरू लागला. आजूबाजूला उभे असणारे लोक थिजून गेले. जणू काही पूर्ण चौकात दगडी पुतळे उभे केले होते.

“अटक करा त्या दोघांना,” गॅस्सलर गुरगुरला. “फेकून द्या त्यांना दरीत! चामडी लोळवा! त्यांची नखं उपटून काढा! नाही..नाही..थांबा..त्यापेक्षा जास्त चांगली कल्पना मला सुचली आहे.”

“तर तू काय म्हणत होतास हर टेल कि मी दुष्ट’ आहे. कायदा हा शेवटी कायदा असतो. पण मी तुला दाखवून देईन कि मी किती निष्पक्ष आणि सज्जन माणूस आहे ते. तुझ्या उद्धट आणि उर्मटपणाबद्दल मी तुला अशी शिक्षा देत आहे कि साठ पावलावरून तू तुझ्या मुलाच्या डोक्यावर ठेवलेल्या सफरचंदाचे एका निशाण्याने दोन तुकडे करायचे. तुला बाण मारायची फक्त एकच संधी मिळेल. तू जर सफरचंद बरोबर कापले तर तू मुक्त आहेस. इतकच नव्हे तर कुणालाही माझ्या टोपीपुढे गुडघे टेकण्याची सक्ती काढून टाकली जाईल.”

“पण जर तुला एका निशाण्यात हे जमलं नाही तर तुझा मुलगा तुझ्या हातानी मारला जाईल किंवा तुझ्या मुलाला मी सोडून देईन. परंतु हर टेल, तुला मात्र मरेपर्यंत तुरुगांत खितपत पडावे लागेल. आणि हा कायदा आहे तसाच पुढे चालू राहील.“

लोकांमधे खळबळ सुरु झाली.



विल्यम टेलने जिमीकडे पाहिले. त्याची छाती धडधडू लागली. जर मला हे नाही जमलं तर?

जिमीला काही होऊ नये म्हणून कुठेतरी लांबवर निशाणा मारायचा आणि तुरुंगात जायचे असं त्याने ठरवलं. निदान जिमीची तरी सुटका होईल आणि त्याला सुखाने जगता येईल. पण हा हर गॅस्सलर विश्वास ठेवण्याच्या लायकीचा आहे का?

“तुम्ही हे आव्हान सगळ्या लोकांसाठी स्वीकारायला हवं, बाबा,” जिमी काकुळतीने म्हणाला. “मी अजिबात घाबरणार नाही. तुम्ही उरीमधील सर्वोत्तम नेमबाज आहात.”



विल्यम टेलने क्षणभर विचार केला आणि म्हणाला. “ठीक आहे, जिमी. मी हे करून दाखवीन.”

हर गॅस्सलरच्या चेहऱ्यावर खुनशी भाव दिसत होते.

गॅस्सलरच्या एका शिपायाने एका मोठ्या झाडाजवळ जिमीला उभे केले. दुसऱ्या शिपायाने त्याच्या डोक्यावर लाल सफरचंद ठेवले.

साठ पावले लांबून विल्यम टेलने धनुष्यात बाण घालून नेम धरला. भात्यात त्याने अजून एक बाण लपवून ठेवला होता.

जमाव थोडा मागे गेला. हर गॅस्सलर त्याच्या खुर्चीत पुढे वाकला.





विल्यम टेलने थोडा वेळ घेतला. डोळे बारीक करून बाण ज्या दिशेने जायला हवा त्या दिशेने त्याने पाहिले. जिमीच्या डोक्यावर ठेवलेल्या सफरचंदाकडे स्थिर नजरेने पाहिले. धनुष्य उचलले, शांत आणि स्थिरपणे त्याने बाण सफरचंदाला मधोमध कापेल अशा रीतीने पकडले.

विल्यम टेलने बाण मारला.

सफरचंदाचे बरोबर मधोमध दोन तुकडे झाले.

जमावाने जयजयकार केला. जिमी खुश झाला. हर गॅस्सलर खुर्चीतच हडबडला.

विल्यम टेल आणि जिमीने आनंदी जमावापुढे वाकून अभिवादन केले. तेव्हा नेमका लपवलेला दुसरा बाण खाली पडला.

हर गॅस्सलर उसळून खुर्चीवरून उठला. “तुला फक्त एक बाण मारायची परवानगी होती, विल्यम टेल. मग हा दुसरा बाण तू का लपवून ठेवला होता?”

“हा दुसरा बाण तुझ्यासाठी होता, हर गॅस्सलर. जर पहिल्या बाणाने माझ्या मुलाला काही झालं असतं तर त्या दुसऱ्या बाणाने मी तुझ्या नरडीचा घोट घेतला असता.”

“दुष्टा!” हर गॅस्सलर किंचाळला. “अटक करा त्याला. नियम अजिबात बदलला जाणार नाही. सर्व लोकांना माझ्या टोपीपुढे झुकायलाच लागणार.”

विल्यम टेलला साखळदंडांनी बंद केलं.



आठवडा उलटून गेला आणि अचानक जंगलामधून घंटांचा निनाद ऐकू आला. अल्टडार्फ, बर्गलन आणि उरीमधील इतर शहरातील लोक त्या विलक्षण बातमीने आनंदून गेले. हर्मन गॅस्सलर ठार झाला होता.

विल्यम टेलने शिपायांना हूल दिली आणि साखळदंड तोडून लेक लुझेम इथील तुरुगांच्या दिशेने जाणाऱ्या बोटीतून त्याने खवळलेल्या पाण्यात उडी मारली. शिपायांची तुकडी घेऊन गॅस्सलर स्वत: त्याच्या शोधात निघाला.

जंगलातल्या रसरसीत झाडापासून बनवलेले धनुष्य आणि बाण घेऊन विल्यम टेल हर्मन गॅस्सलरची वाट पहात थांबला. सैनिकांची तुकडी एका अरुंद पायवाटेने जात असताना विल्यम टेलने बाण सोडला आणि तो बरोबर हर्मन गॅस्सलरच्या छातीत घुसला.

लोकांची दुष्ट आणि अत्याचारी गॅस्सलरपासून कायमची सुटका झाली.

विल्यम टेल विजेत्याच्या थाटात घरी परतला.



लिओनार्ड एवरेट फिशरनी मुलांसाठी विविध प्रकारची अनेक पुस्तके लिहिली. बाल साहित्यातील योगदानासाठी त्यांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले. १९९५ मधे त्यांनी हिल अर्बुथनोट व्याख्यान दिले. १९९१ ला त्यांना कॅथलिक लाइब्ररी असोसिएशन तर्फे “रेगिना मेडल” आणि मिनेसोटा विश्वविद्यालयाचा “केरलन पुरस्कार” मिळाले. १९८९ मधे “द वॉशिंगटन पोस्ट” आणि वाशिंगटन डी.सी. की चिल्ड्रेन्स बुक गिल्ड, वाशिंगटन डी.सी. यांच्यातर्फे ललितेतर पुरस्कार देण्यात आला. श्री फिशर आपल्या पत्नीसोबत वेस्टपोर्ट, कनेक्टिकट इथे राहत होते.